आंतरराष्ट्रीय कृषि विकास निधी (IFAD) सहाय्यित तेजस्विनी महाराष्ट्र ग्रामीण महिला सक्षमीकरण कार्यक्रम राबविण्याकरिता महिला आर्थिक विकास महामंडळास सन २०१६-१७ करिता निधी उपलब्ध करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-माविम-२०१६/प्र.क्र.६६/का-१०**
नवीन प्रशासन भवन, तिसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
तारीख-२१ मार्च, २०१७.

**वाचा :-**

१. वित्त विभाग परिपत्रक क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२० एप्रिल, २०१६.

**प्रस्तावना :-**

सन २०१६-१७ या आर्थिक वर्षासाठी २२३५ A ४८५ या लेखाशिर्षाखाली आयफॅडचा हिस्सा म्हणून ₹ १०,००,००,०००/- (अक्षरी रुपये दहा कोटी फक्त) इतकी तरतूद पुरवणी मागणीद्वारे मंजूर आहे. वित्त विभागाच्या संदर्भाधिन परिपत्रकानुसार पुरवणी मागणीद्वारे मंजूर निधी ₹ १०,००,००,०००/- (अक्षरी रुपये दहा कोटी फक्त) निधीच्या ८० % मर्यादेत ₹ ८,००,००,०००/- (अक्षरी रूपये आठ कोटी फक्त) इतका निधी तेजस्विनी ग्रामीण महिला सक्षमीकरण कार्यक्रम राबविण्यासाठी महिला आर्थिक विकास महामंडळास (माविम) वितरित करण्यात आला आहे. सदर निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र माविमने शासनास सादर केले आहे. सन २०१६-१७ या आर्थिक वर्षासाठी २२३५- A ४८५ या लेखाशिर्षाखालील उर्वरीत अवितरित तरतूद ₹ २,००,००,०००/- (अक्षरी रुपये दोन कोटी फक्त) माविमला वितरित करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

आंतरराष्ट्रीय कृषि विकास निधी (आयफॅड) सहाय्यित तेजस्विनी महाराष्ट्र ग्रामीण महिला सक्षमीकरण कार्यक्रम राबविण्याकरीता महिला आर्थिक विकास महामंडळास आयफॅडचा हिस्सा म्हणून सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात **₹२,००,००,०००/- (अक्षरी रुपये दोन कोटी फक्त)** इतकी तरतुद वितरीत करण्यास याव्दारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. याकरीता जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी हा निधी महिला आर्थिक विकास महामंडळास वितरित करावा.

३. मुक्त करण्यात आलेले अनुदान जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर यांच्या सहीने तयार केलेले व उपसचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय यांनी प्रतिस्वाक्षरी केलेले देयक अधिदान व लेखा अधिकारी यांना सादर करावे. अधिदान व लेखा अधिकारी यांनी सदर देयकातील

मंजूर रक्कम धनादेशाद्वारे अदा करावी. उपसचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय यांना जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर यांनी सादर केलेल्या देयकावर प्रतिस्वाक्षरी करण्याचे अधिकार दिलेले आहेत.

४. हा निधी महिला आर्थिक विकास महामंडळास वितरित केल्यानंतर केंद्र शासनामार्फत आंतरराष्ट्रीय कृषि विकास निधी कडून याची प्रतिपूर्ती करुन घेण्यात येईल.

५. हा खर्च मागणी क्रमांक एक्स-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२, समाजकल्याण, १०३, महिला कल्याण, (०३) (१०) तेजस्विनी ग्रामीण महिला सक्षमीकरण कार्यक्रम राबविण्यासाठी महिला आर्थिक विकास महामंडळास सहायक अनुदान (२२३५ A ४८५) ३१-सहायक अनुदान (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ या वित्तीय वर्षाकरीता मंजूर असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

६. हा शासन निर्णय नियोजन विभाग व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.१४८/अर्थ-७/१७, दि.१४ मार्च,२०१७ अन्वये त्या विभागाने दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०३२११११३४२५५१३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Smita Dattatray Nivatkar

Digitally signed by Smita Dattatray Nivatkar
DN: CN = Smita Dattatray Nivatkar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Women And Child Department
Date: 2017.03.21 15:54:34 +05'30'

**(स्मिता निवतकर)**
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१.
३. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.
४. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
७. जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर.
८. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.कक्ष अधिकारी (का.४), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.निवड नस्ती (का-१०)